वस्त्रोद्योग धोरणांतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: धोरण-२०२४/प्र.क्र.१०५/टेक्स-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ३१ मार्च, २०२५

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०११/प्र.क्र.३३५/टेक्स-२, दि. ०२.०१.२०१२.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०१२/प्र.क्र.१/टेक्स-२, दि. ०१.०३.२०१२.
३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक धोरण-०१२/प्र.क्र.२५७/टेक्स-२, दि. २१.०२.२०१४.
४) शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण -२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३,दि.१७.०४.२०१५.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०१५/प्र.क्र.१५१/टेक्स-५, दि.०२.१२.२०१५.
६) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक धोरण-२०१५/प्र.क्र.३६४/टेक्स-५, दि.१८.०४.२०१६.
७) शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण -२०१६/प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा-५,दि.१०.०५.२०१६.
८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०१७/प्र.क्र. ६/टेक्स-५, दि.१५.०२.२०१८.
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०१७/प्र.क्र. ६/टेक्स-५, दि.२१.१२.२०१८.
१०) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक धोरण-२०१९/प्र.क्र.०१/टेक्स-५, दि.१६.०१.२०१९.
११) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०१/टेक्स-५, दि.०४.१२.२०१९.
१२) वित्त विभाग, शासन परीपत्रक, क्रमांक- अर्थसं -२०२४/प्र.क्र.३२/अर्थ-३, दि. ०१.०४.२०२४.
१३) वित्त विभाग, शासन परीपत्रक, क्रमांक- अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४.
१४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक संकिर्ण-२०२३/प्र.क्र.७८/टेक्स-५, दि.२८.०३.२०२४.
१५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०२४/प्र.क्र.१०५/टेक्स-५, दि.२६.०९.२०२४.

**प्रस्तावना :-**

दि.२३.०९.२०२४ रोजीच्या बैठकीत मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार मे.रेमंड लक्झरी कॉटन्स लि., अमरावती या घटकाने त्यांचे प्रकल्पात वस्त्रोद्योग धोरण, २०११-१७ या कालावधीत, बँक अर्थसहाय्यीत निधी व स्वयंसहाय्य निधीतून खरेदी केलेली यंत्रसामुग्री, संलग्न उपकरणे यावरील गुंतवणूकीवर वस्त्रोद्योग विभागाच्या दि.२१.१२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ मधील मुद्दा क्र. ७.४.अ. मध्ये केलेल्या सुधारणेनुसार भांडवली अनुदान मंजूर करण्याबाबतचा शासन निर्णय दि.२६.०९.२०२४ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

२. वरील संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याच्या वस्त्रोद्योग धोरणांतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान या योजनेच्या मार्गदर्शक सुचना विहित केल्या आहेत. त्यानुसार वस्त्रोद्योग धोरणांतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान या योजनेअंतर्गत प्राप्त प्रस्तावांना सन २०२४-२५ मधील उपलब्ध तरतूदीनुसार या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टामधील विवरणपत्रानुसार अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्याच्या वस्त्रोद्योग धोरणांतर्गत व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान या योजनेखाली सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीने मान्यता दिलेल्या प्रकल्पांना सन २०२४-२५ मध्ये वित्त विभागाने खर्चासाठी मान्यता दिलेल्या तरतूदीतून या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टामधील विवरणपत्रानुसार एकूण रू.५०,१३,३६,०००/- (अक्षरी रुपये पन्नास कोटी तेरा लाख छत्तीस हजार फक्त) इतकी रक्कम मंजूर करुन वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तथापी, सदर रक्कम संदर्भ क्र.११ येथील शासन निर्णयान्वये गठीत दक्षता व नियंत्रण पथकाद्वारे ज्या प्रकल्पांची तपासणी झाली असून व ज्या प्रकल्पांमध्ये अनियमितता आढळून आली आहे अशा प्रकरणात अंतिम निर्णय झाल्यावरच अनुदान वितरीत करण्यात येईल किंवा झालेल्या निर्णयानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल. तसेच ज्या प्रकल्पांची दक्षता व नियंत्रण पथकाकडून वेळेअभावी अद्याप तपासणी झालेली नाही त्या प्रकल्पांची पुढील नजीकच्या काळात लवकरच तपासणी करण्यात येईल आणि त्याप्रकल्पात तपासणीअंती काही अनियमितता आढळून आल्यास या आदेशाद्वारे मंजूर अनुदान व्याजासह वसुल करण्यात येईल.

२.	सदरहू वस्त्रोद्योग घटकास वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रक्कम योजनेच्या दिशानिर्देशानुसार या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बँकांच्या खात्यावर R.T.G.S./N.E.F.T. द्वारे वितरीत करण्यात यावी. वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेली अर्थसहाय्याची रक्कम संबंधित बँकेने या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टामधील त्यांच्याशी संबंधित वस्त्रोद्योग घटकाच्या कर्ज खात्यात जमा करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेबसाइटवर ऑनलाईन सादर करावे.

३.	वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम संबधित बँकेस वितरीत करण्याकरीता श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री. श्रीकृष्ण पवार, उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, (V०००९) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून VPDA क्रमांक ७१०१०७००३६ या खात्यावर आहरीत करुन ती सोबतच्या परिशिष्टात नमुद केलेल्या बँकांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४.	यावर होणारा खर्च " मागणी क्रमांक व्ही-२, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२)(७८) राज्य वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान (कार्यक्रम) (३३, अर्थसहाय्य) (२८५१ ६५६५)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५.	वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक- अर्थसं -२०२४/प्र.क्र.३२/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक- अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ या परीपत्रकातील तसेच त्यासोबतच्या तपासणी सुचीतील लागू असलेल्या सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

६.	वित्त विभाग शासन परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.०५.२०१६ च्या परिशिष्ट-अ मधील अनु.क्र. १ ते ९ संदर्भातील तपासणी सुची मधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्द्यांची पुर्तता होत आहे. सदर परीपत्रकानुसार परिशिष्ट-अ मधील अनु.क्र.१ ते ९ संदर्भातील माहीती खालील प्रमाणे आहे:-

(१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:-वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ अन्वये ३३ अर्थसहाय्य या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परीपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

(२) मंजूर निधी:- "मागणी क्रमांक व्ही-२, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२)(७८) राज्य वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान (कार्यक्रम) (३३, अर्थसहाय्य) (२८५१ ६५६५)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मध्ये या योजनेखाली सुधारित अंदाजान्वये उपलब्ध रू.२७०००.०० लाख निधीमधून प्रस्तुत शासन निर्णयाअन्वये रू.५०,१३,३६,०००/- (अक्षरी रुपये पन्नास कोटी तेरा लाख छत्तीस हजार फक्त) निधी वितरीत करण्यात येत आहे.

(३) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- या योजनेखाली यापुर्वी खर्चास परवानगी दिलेला सर्व निधी खर्च करण्यात आलेला आहे.

(४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे. त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- या योजनेखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे:- या योजनेखाली स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देण्यात येत नसल्याने सदर बाब या प्रकरणी लागू होत नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे लागू:- या योजनेखाली वैयक्तिक लाभार्थीचे देयक देण्यात येत नसल्याने सदर बाब या प्रकरणी लागू नाही.

(७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा:- या योजनेखाली बांधकाम विषयक प्रस्ताव नसल्याने सदर बाब या प्रकरणी लागू होत नाही.

(८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमीत करण्यापुर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत:- या योजनेखाली

अधिनस्त कार्यालयांना खरेदी विषयक प्रस्ताव नसल्याने सदर बाब या प्रकरणी लागू होत नाही.

(९) खरेदी विषयक प्रक्रीया अद्यावत संबंधीत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- या योजनेखाली खरेदी विषयक प्रस्ताव नसल्याने सदर बाब या प्रकरणी लागू नाही.

७. सदर शासन निर्णय, संदर्भिय अ.क्र. १० येथील शासन निर्णयान्वये सचिव (वस्त्रोद्योग), यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या संपन्न झालेल्या बैठकीत मंजूर वस्त्रोद्योग प्रकल्पांच्या दाव्यांना मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक- २६५/२०२५/व्यय-२, दि.२९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११५२८५९२८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD GANPATRAO PAWAR

Digitally signed by PRAMOD GANPATRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ba1df963775f8ead7f10c7f6fad8e2573f437f35d4b00e09a9b9c0ccdbf0d42a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5D6B51FDDC1FD566C46A6440D68EF83795379225572F777B66113D5833F98B04, cn=PRAMOD GANPATRAO PAWAR
Date: 2025.03.31 15:30:00 +05'30'

**( प्रमोद पवार )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई (ई-मेलद्वारे)
९. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई (ई-मेलद्वारे)
१०.अवर सचिव (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (३ प्रती ),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग
१२.मंत्रालय, मुंबई.
१३.परिशिष्टामधील बँका (टफ सेल) (ई-मेल व्दारे).
१४.निवड नस्ती, कार्यासन टेक्स-५

दि.३१ मार्च, २०२५ रोजीच्या शासन निर्णयासोबतचे परिशिष्ट -

**(Rs. in Lakh)**

| sr. no. | UID | Unit Name | Claim year | Amount | Bank Name |
|---|---|---|---|---|---|
| 1 | NP/2014/10082 | Raymond Luxury Cottons Ltd. | 2018 | 1504.01 | State Bank of India |
| 2 | NP/2014/10082 | Raymond Luxury Cottons Ltd. | 2019 | 1504.01 | State Bank of India |
| 3 | NP/2014/10082 | Raymond Luxury Cottons Ltd. | 2020 | 2005.34 | State Bank of India |
| **Total** | | | | **5013.36** | |

| | | | |
|---|---|---|---|
| Sr.No | 1 | Bank Name | State Bank of India |
| Account Name | Subsidy Inward Remit-NEFT/RTGS Account | Account Number | 42806624400 |
| IFSC Code | SBIN0003439 | | |